**मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार स्थानिक स्वराज्य संस्थांच्या उच्च प्राथमिक शाळांमधील अंशकालीन निदेशकांच्या मानधनासाठी राज्य हिस्स्याचा निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- न्यायाप्र २०२५/प्र. क्र. ७९ (ई-११२७२४२)/ एसडी-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- २० जुन २०२५.

**संदर्भ :-**

१) राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र, क्र. मप्राशिप/सशि/ अं.नि./ २०२५-२६/ १२३६, दि.२८.०४.२०२५.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५.
३) शासन परिपत्रक, क्र. आरटीई २०२१/ प्र. क्र. ३०/ एसडी-१, दि.१४.१०.२०२४.
४) शासन पत्र, क्र. आरटीई २०२१/ प्र. क्र. ३०/ एसडी-१, दि.२८.०६.२०२४, दि. १६.०७.२०२४ व दि.१९.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ (RTE Act, २००९) मधील अनुसूचीमध्ये प्रत्येक शाळेसाठी निकष व दर्जा नमूद केलेला आहे. त्यातील अ.क्र.१(b)(३)(ii) मध्ये असे नमूद केले आहे की, इयत्ता ६ वी ते ८ वीच्या वर्गातील ज्या उच्च प्राथमिक शाळांची विद्यार्थी पटसंख्या १०० पेक्षा जास्त आहे, अशा शाळांमध्ये अंशकालीन निदेशक (A) कला शिक्षण (B) शारीरिक शिक्षण व आरोग्य (C) कार्यशिक्षण (कार्यानुभव) या विषयांकरिता नेमण्याची तरतूद आहे.

२. अंशकालीन निदेशकांना नियुक्ती व मानधन मिळणेबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र. ८७८६/२०२१ श्रीमती गायत्री मुळे व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर विविध याचिका दाखल करण्यात आलेल्या आहेत. त्यानुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि. ०८.०५.२०२४ रोजीच्या आदेशान्वये अंशकालीन निदेशकांना नियुक्ती व मानधन अदा करणेबाबत राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी दि.२८.०६.२०२४ रोजीच्या पत्रांन्वये कळविण्यात आले होते. त्यानुसार, राज्य प्रकल्प संचालक यांच्या कार्यालयाकडून अंशकालीन निदेशकांना रुजू करून घेण्याबाबत संबंधीत जिल्ह्यांना कळविण्यात आले होते. तथापि, जिल्हास्तरावर काही ठिकाणी अंशकालीन निदेशकांना रुजू करून घेण्यास अडचणी उद्भवत असल्याने राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी दि.०५.०९.२०२४ रोजीच्या पत्रान्वये तसेच, जिल्हास्तरावरून अंशकालीन निदेशकांच्या नियुक्तीसंदर्भात प्राप्त होणाऱ्या समस्यांच्या अनुषंगाने शासनस्तरावरून उचित मार्गदर्शन मिळण्याबाबत विनंती करण्यात येत होती. सदर बाबी विचारात घेता, स्थानिक स्वराज्य संस्थांमधील उच्च प्राथमिक शाळांमध्ये अंशकालीन निदेशकांची नियुक्ती करण्यासंदर्भात सर्वसाधारण सुचना दि. १४.१०.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

३. मा.उच्च न्यायालयाने दि.०२.०४.२०२४ व दि.०८.०५.२०२४ रोजी पारीत केलेल्या आदेशाच्या अंनुषंगाने अंशकालिन निदेशकांना नियुक्ती देणे व माहे एप्रिल २०२४ पासून रु.७०००/- दरमहा मानधन अदा करणेबाबत राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांना दि.२८.०६.२०२४ रोजीच्या पत्रांन्वये कळविण्यात आले आहे. त्यानुसार, मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल केलेल्या १६६२ याचिकाकर्ते यांना १०० पटसंख्या असणाऱ्या शाळांवर हजर करून त्यांना एप्रिल २०२४ ते मार्च २०२५ पर्यंतचे मानधन जिल्हा परिषद / मनपा स्तरावरून केलेल्या मागणीनुसार अदा करण्यात आले आहे.

४. केंद्र शासनाने पूर्वाश्रमीची सर्व शिक्षा अभियान योजना तसेच नव्याने कार्यान्वित असलेली समग्र शिक्षा योजनेमध्ये अंशकालीन निदेशकांना शैक्षणिक वर्षातील एकूण १० महिन्यांकरीता केंद्र शासनाकडून निधी मंजूरीची तरतूद नमूद आहे. तथापि, मा.उच्च न्यायालयाच्या दि. ०२.०४.२०२४ व दि. ०८.०५.२०२४ रोजीच्या आदेशांनुसार याचिका दाखल केलेल्या एकूण १६६२ याचिकाकर्ते अंशकालीन निदेशकांचे एप्रिल, २०२४ व मे, २०२४ च्या मानधनाकरीता रु.२,३२,६८,०००/- इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई कार्यालयाने खर्च केलेला आहे. तसेच, एप्रिल, २०२५ व मे, २०२५ करीता न्यायालयीन प्रकरणात सहभागी असलेले व न्यायालयीन प्रकरणाबाहेरील ३४३० अंशकालीन निदेशकांना मानधन अदा करण्यासाठी रक्कम रु.४,८०,२०,०००/- इतका निधी आवश्यक असून एकूण रु.७,१२,८८,०००/- इतका निधी उपलब्ध करून देण्याबाबत राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र. १, दि.२८.०४.२०२५ अन्वये विनंती केली आहे. त्यानुषंगाने मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार अंशकालीन निदेशकांच्या मानधनासाठी आवश्यक असणारा रु.७,१२,८८,०००/- इतका निधी "मागणी क्र. ई-२, (२२०२ आय ६१२), ३१-सहायक अनुदाने (राज्य हिस्सा ४० टक्के)" या लेखाशिर्षाखालील निधीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र.८७८६/२०२१ प्रकरणी दि. ०२.०४.२०२४ व दि. ०८.०५.२०२४ रोजी पारीत केलेल्या आदेशांनुसार याचिका दाखल केलेल्या एकूण १६६२ याचिकाकर्ते अंशकालीन निदेशकांचे राज्य प्रकल्प संचालक यांच्या कार्यालयाने एप्रिल, २०२४ व मे, २०२४ च्या मानधनाकरीता खर्च केलेला रु.२,३२,६८,०००/- इतका निधी तसेच, एप्रिल, २०२५ व मे, २०२५ करीता न्यायालयीन प्रकरणात सहभागी असलेले व न्यायालयीन प्रकरणाबाहेरील ३४३० अंशकालीन निदेशकांना मानधन अदा करण्यासाठी आवश्यक असणारी रक्कम रु. ४,८०,२०,०००/- इतका निधी असा एकूण रु.७,१२,८८,०००/- (अक्षरी रु. सात कोटी बारा लक्ष अठ्ठ्यांऐंशी हजार फक्त) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक परिषद, मुंबई यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. अंशकालीन निदेशकांच्या मानधनाची रक्कम बँक खात्यातच जमा करावी. याबाबत कोणतीही अनियमितता होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

३. कार्यरत अंशकालीन निदेशकांचे मानधन अदा केल्यानंतर निधी शिल्लक राहिल्यास त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. शिल्लक निधीचा विनियोग करण्यापुर्वी शासनाची पूर्वमान्यता घेण्यात यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र एक महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावे.

४. सदर खर्च "मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (२२०२ आय ६१२) (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचेकडे सुपूर्त करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करून वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख शाखा/ लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी" तर सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरीत करुन समग्र शिक्षा योजनेच्या SNA खात्यात जमा करावा. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी जिल्हा परिषद/ महानगरपालिका निहाय वितरीत करावा. वितरीत केलेल्या निधीचा तपशिल शासनास सादर करावा.

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०७.०४.२०२५ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरिताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.३२४/१४७१, दि.०४.०६.२०२५ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.६८६/व्यय-५, दि.१२.०६.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६२०१२५२४६९३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e89181186 34069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7 B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.06.20 12:53:59 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष / सभापती, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
४. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व).
५. मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई
६. मा. विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई (सर्व)
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
११. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर.
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३.
१७.सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग).
१८. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१९. उप सचिव, वित्त विभाग, (व्यय-५/ अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
२०. उप सचिव (एसडी/ प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. उप सचिव (१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. अवर सचिव/ कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवड नस्ती (एसडी-१).